ॐ नमः शिवाय

# संक्षिप्त श्री शिवलीलामृत



लेखक

गिरीश सुधीर मोडक

ॐ

# || संक्षिप्त श्री शिवलीलामृत ||

: लेखक व प्रकाशक :

गिरीश सुधीर मोडक
११७६, सदाशिव पेठ, श्रीकृपा अपार्टमेंट,
लिमयेवाडी, पुणे ४११०३०

: आवृत्ती :

महाशिवरात्री शके १९३५
२७ फेब्रुवारी २०१४



## अनुक्रमणिका

# प्रस्तावना

पूज्य श्रीधरस्वामी नाझरे यांनी इ. स. १७२२ मध्ये 'शिवलीलामृत' हा ग्रंथ बारामतीजवळ कऱ्हेकाठी एका मंदिरात बसून लिहिला. हा रसाळ ग्रंथ म्हणजे ऋग्वेदांतर्गत स्कंदपुराणातील ब्रह्मोत्तरखंडाचे मराठी भाषांतर असून प्रस्तुत रचनेत चौदा अध्याय व सुमारे २४५० ओव्या आहेत.

त्यानंतर कोण्या अज्ञात कवीने ३२५ ओव्यांचा १५ वा अध्याय मूळ ग्रंथात समाविष्ट केला. अशा रीतीने एकूण २७७५ ओव्या व १५ अध्यायांनी युक्त असे हे प्राकृतात रूढ झालेले 'शिवलीलामृत' लहान पोथीरूपात पाहिल्यास त्याची पृष्ठसंख्या सुमारे ४७० भरते. सदर रचनेची जनमानसात रुजलेली पारायण पद्धती पाहता रोज दोन अध्याय अशा प्रकारे सुमारे एका सप्ताहाचा कालावधी सहसा एका पारायणास लागतो.

रोज संपूर्ण पारायणासाठी लागणारा वेळ काढणे शक्य नसल्यामुळे जर शिवभक्तीची मनापासून आस असेल तर केवळ अकरावा अध्याय म्हणून देखील पुण्य प्राप्त होते व या अध्यायाच्या पारायणाने रोज रुद्र केल्याचे श्रेय मिळते असे पूज्य श्रीधरस्वामी त्याच अध्यायात सांगतात.

वास्तविक पाहता संपूर्ण ग्रंथामध्ये जो भाव दडलेला आहे त्याची उकल करता असे लक्षात येते की नानाविध आपत्तींना सामोरे जात असता अनन्य भावाने परमेश्वराची उपासना केल्यास दुःखांचा परिहार होतो व अंती मोक्षपदाची प्राप्ती होते. मूळ कवीला वेगवेगळया प्रकारे दाखले देऊन एकच गोष्ट वाचकांपर्यंत पोहोचवायची आहे की जीव व शिव या जरी एकाच नाण्याच्या दोन बाजू असल्या तरीही जर शिवाची मनापासून भक्ती केली तर जिवाचे आपोआपच कल्याण होईल. 'श्री शिवलीलामृताचा' मतितार्थ जरी हा असा असला तरी प्रत्येक अध्याय वेगळा आहे, वेगवेगळया पौराणिक पात्रांना समर्पित आहे व प्रत्येकाची गोडी अवीट आहे.

त्यामुळे त्या सदाशिवाने माझ्या मनात आणले की संपूर्ण शिवलीलामृताचे संक्षिप्त रूप लिहिले तर थोडक्या शब्दांत व थोड्या

वेळात पूर्ण ग्रंथाचे पारायण करणे शक्य होईल. याच इच्छेपोटी श्री शंकरांनी आशीर्वाद देऊन माझ्याकडून हे 'संक्षिप्त श्री शिवलीलामृत' लिहून घेतले.

प्रस्तुत रचनेत देखील १५ अध्याय असले तरीही अभंगसंख्या ७८५ असून पृष्ठसंख्या २६ आहे. त्यायोगे हे संक्षिप्त रूप एकूण अक्षरसंख्येनुसार मूळ शिवलीलामृताच्या सुमारे एक सप्तमांश भरते. (वाचकांनी कृपया हे लक्षात घ्यावे की मूळ रचनेत ओव्या आहेत तर संक्षिप्त रूपात अभंग आहेत. मूळ ओ व्यांमध्ये अक्षरसंख्या सुमारे ४२ आहे तर प्रस्तुत रचनेतील प्रत्येक अभंगात सुमारे २२ अक्षरे आहेत. ) अशा प्रकारे संक्षिप्त रूप बनवत असताना प्रत्येक अध्यायाचा मूळ गाभा तोच ठेवला गेला आहे. एखादी गोष्ट मनावर बिंबविण्याकरिता मूळ कवीने जे खूपच विस्तृत विवेचन केले आहे त्यातील मुख्यत्वे करून काय करावे व काय करू नये हा भाग तसाच ठेवून त्याच्या परिणामांना काही ठिकाणी जाणीवपूर्वक बगल दिली गेली आहे.

उदाहरणार्थ द्वितीय अध्यायात व्याध हरणाच्या कथेत 'जे दुसऱ्याच्या गायी चोरतात ते अल्पायुषी होतात' किंवा 'जे धन्याचा विश्वासघात करतात ते पुढील जन्मी कुत्रा होतात' या दोन संकल्पनांमध्ये गायी चोरू नयेत अथवा धन्याचा विश्वासघात करू नये हा गाभा तर अल्पायुषी होणे किंवा कुत्रा होणे हे परिणाम. भयानक परिणाम कथन केले की गाभा लक्षात राहतो हा जर उद्देश असेल तर नुसता गाभा मनात ठसला व त्याप्रमाणे वागले तरीही वाईट परिणाम आपोआपच टळतील किंवा चांगले परिणाम आपोआपच होतील अशी या संक्षिप्त रूपामागील संकल्पना. असो...

सदर रचना सर्वांना नक्कीच आवडेल व संपूर्ण शिवलीलामृताचे सारग्रहण त्यांस कमी कालावधीत करणे शक्य होईल अशी खात्री आहे. परंतु ते वाचण्याअगोदर जर एकदा 'श्री शिवलीलामृत' किंवा गोष्टीरूप 'श्री शिवलीलामृत कथासार' याचे वाचन केले तर सर्व संदर्भ नीट लागतील याची नोंद घ्यावी. कृपया अभिप्राय कळवावा ही विनंती.

-गिरीश सुधीर मोडक /९४२०८६१७४५/gsmodak@yahoo.com

श्री

## अध्याय पहिला

### पंचाक्षरमंत्र महात्म्य (दाशार्ह आख्यान)

करोनी वंदन | गणेशाचे प्रति | शिवाचे चरित्र | ऐकावे जी ||1||
अनादी अनंत | तूचि परब्रह्म | हेरंबाचा तात | जगत्पती ||2||
अविनाशी आणि | भक्तवल्लभही | त्रिशूळपाणि तू | विश्वंभर ||3||
उमेचा तू पती | ब्रह्मांडनायक | भक्तांचे रक्षण | करीतसे ||4||
बारा ज्योतिर्लिंगे | रूपाने जो स्थित | वर्णन करणे | अग्निदिव्य ||5||
धरित्री कागद | जलधीची शाई | कल्पतरूरूपी | लेखणीही ||6||
जरी घेवोनिया | बसली शारदा | वर्णन करीत | शंकराचे ||7||
आशीर्वादा विण | शक्य नाही कोणा | ग्रंथाचे लेखन | कदापीही ||8||
विष्णूच्या वर्णिल्या |अनंत त्या लीला |ग्रंथात या ऐका |शिवलीला ||9||
शिवलीलामृत | काव्य असे थोर | पातकांचा नाश | करीतसे ||10||
अद्‌भूत हे काव्य | करिता श्रवण | लक्ष्मी नांदतसे | स्वगृहात ||11||
दीर्घायुरारोग्य | इच्छित संतती | चारधाम यात्रा | घडतसे ||12||
! नमः शिवाय | जरी श्रेष्ठ मंत्र | गुरू मुखातून | घेणे योग्य ||13||
मथुरा नरेश | दाशार्ह नृपती | त्याची थोर ख्याती | त्रिखंडात ||14||
कर्तव्यतत्पर | पराक्रमी शूर | विद्या कलावान | मधुभाषी ||15||
कलावती त्याची | होती पट्टराणी | नितांत सुंदर | अर्धांगिनी ||16||
कामातुर राजा | नंदन कामने | धाडी निमंत्रण | महालात ||17||
सांगोनी कारण | शिवाराधनेचे | टाळी आज्ञा जरी | पतिव्रता ||18||
बळे घेता तिला | स्वबाहूपाशात | नृपालाचे तन | होरपळे ||19||
पुसता कारण | सांगे कलावती | दुर्वासांची भक्ती | तिच्या मनी ||20||
गुरुमुखातून | शिवपंचाक्षर | ऐकोनी पावन | ज्ञानी झाली ||21||
राजाचे शरीर | शिवभक्तीविना | गुरूभक्तीविना | अपवित्र ||22||
दाशार्ह विनवी | स्वतःच्या भार्येस | तूचि शिवमंत्र | मज द्यावा ||23||
कलावती तेंव्हा | सांगे भूपाळास | गर्गमुनींद्वारा | दीक्षा घ्यावी ||24||
त्वरित दोघेही | गर्गमुनींपाशी | शरण येवोनी | उभे ठाले ||25||
यमुनेत स्नान | होवोनी पावन | शिवाचे पूजन | कर्ते झाले ||26||
तदनंतर त्या | गर्ग महर्षींनी | राजास दिधला | शिवमंत्र ||27||
दाशार्ह नृपती | झालासे सज्ञान | पापरूपी काक | त्यजुनिया ||28||
षड्रिपू वासना | द्रोह हत्या भेद | दुराचार सारे | झाले दूर ||29||

गुरुविण व्यर्थ | सर्वांचे जीवन | सुखाचे कारण | तोचि गुरू ||30||
शिवपंचाक्षर | ॐ नमःशिवाय | त्याच्या योगे सर्व | भव मुक्त ||31||
जे कोणी ऐकेल |दाशार्ह आख्यान |शिव त्याचा राही |पाठीराखा ||32||
संपूर्ण जाहला | प्रथम अध्याय | नमन करूया | शंकरास ||33||

श्री

## अध्याय दुसरा

### महाशिवरात्री महात्म्य (मृग-व्याध आख्यान)

जाणतेपणाने | किंवा नकळत | प्राणिमात्रे घेता | शिवनाम ||1||
होतसे प्रसन्न | तोचि भोळासांब | करीतसे नाश | संकटांचा ||2||
महाशिवरात्र | शुभदिन अती | करिता जागर | पुण्य फार ||3||
उपास धरोनी | बिल्व पत्रांयोगे | पूजिता शंकर | पाप नाश ||4||
विंध्य गिरी वरी | प्राणी हत्येपायी | भिल्ल तो बुडाला | पातकात ||5||
महाशिवरात्री | शिकारीस गेला | वाटेत पहिले | शिवधाम ||6||
गर्दीतून तोच | पुढे पुढे गेला | टाळोनी दर्शन | शंकराचे ||7||
शिवभक्तांचीच | करीत नक्कल | नकळत त्याच्या | मुखी नाम ||8||
मावळता दिन | तयास दिसले | कमळासहित | सरोवर ||9||
काठावर त्याच्या | घनदाट झाडी | होते सर्व तेही | बिल्ववृक्ष ||10||
शिकार साधण्या | चढोनी बैसला | एका वृक्षावर | भुकेलेला ||11||
वामहस्ते त्याच्या | धनुष्य व बाण | उजव्या हाताने | पाने तोडी ||12||
खालती टाकोनी | तोडलेली पाने | समोर मोकळी | जागा करी ||13||
त्याच वृक्षाखाली | होते शिवलिंग | तयावर पडे | बिल्व पत्र ||14||
भिल्ला  नकळत | घडे शिवपूजा | महाशिवरात्री | उपवास ||15||
अनाहूतपणे | मुखी त्याच्या होते | रात्रभर एक | शिवनाम ||16||
तयामुळे त्याचे | दोष निवारण | होऊ लागले की | आपसूख ||17||
उलटता तोची | रात्रीचा प्रहर | सावज तयास | दिसलेकी ||18||
सुंदर हरिणी | जलाचे प्राशन | करण्यास आली | काठावर ||19||
बाण सोडणार| भिल्ल तिच्यावर | तोची त्यास सांगे | थांबावया ||20||
म्हणे ती हरिणी| आहे मी गर्भिणी | करू नये हत्या | तू बा माझी ||21||
दश लाख विप्र | हत्येचे पातक | लागेल तुला या | हत्येपायी ||22||
भिल्ल तेंव्हा तिला| विचारे सत्वर | कशामुळे तू गे | ज्ञानी झाली ||23||
मग ती हरिणी | सांगे स्वयंकथा | कशी आली रंभा | पृथ्वीवर ||24||
शिवाचे पूजन | गेली विसरून | सोडोनिया व्रते | वैकल्येही ||25||

रूपाच्या गर्वाने | दूर केले देव | हिरण्य दानव | प्रिय झाला ||26||
शिवाने तेधवा | दिला तिला शाप | सख्यांसह जाई | मृत्यू लोकी ||27||
हिरण्यासहीत | सख्यांबरोबर | रंभा आली अशी | अरण्यात ||28||
मागता उ:शाप | शिव बोले तीस | तपानंतर तू | होशी मुक्त ||29||
सांगुनी वृत्तान्त | व्याधा सविस्तर | करे ती विनंती | सोडण्याची ||30||
जन्म देवोनिया | मम बालकांना | येते परतून | तुझ्यापुढे ||31||
वेदपराङ्ग्मुख | ब्राह्मण अथवा | गुरूचा निंदक | अधर्मीही ||32||
वर्मावरी घात | दुसऱ्या देवोन | काक बनतात | झडकरी ||33||
वाईट गुरु तो | होतसे पिंगळा | गाईंना चोरणे | महापाप ||34||
नवऱ्याची निंदा | सेवकांना त्रास | धर्माचा विटाळ | मनी जाणा ||35||
घरामध्ये चोरी | अतिथीची चेष्टा | मातापित्या त्रास | कुलक्षण ||36||
घेतली शपथ | लागतील पापे | वरील सर्वांची | मजलागी ||37||
सोडोनिया देई | मृगकामिनीस | शिवपूजा चालू | नकळत ||38||
चाहूल लागता | दुसऱ्या मृगाची | तीर सोडण्या तो | होई पुढे ||39||
पती भेटीसाठी | भावूक हरिणी | मागे जीवदान | व्याधापाशी ||40||
अती विध्वंसक | भित्रा तो क्षत्रिय | संत देव निंदा | करिती जे ||41||
स्वगृही कलह | प्रेताची कुचेष्टा | देहाचा विक्रय | महापाप ||42||
असता कृतघ्न | जंताचा तो जन्म | खोटा साक्षीदार | नरकात ||43||
अडविता पाणी | वेदना असह्य | स्व राजाची निंदा | क्षुधाक्षय ||44||
मोडता देऊळ | जाती हात पाय | छळता पत्नीस | अर्धांगवात ||45||
वृक्षांचे छेदन | बुडवी जो धन | एकाकी संसारी | रममाण ||46||
नसे दानशूर | करी जो विद्वेष | गोवध जो करी | महापापी ||47||
परस्त्रीस त्रास | स्वगुरूचा त्याग | सूर्याची कुचेष्टा | कष्टप्रद ||48||
करता कोणाच्या | मृत अपत्याची | निष्कारण चेष्टा | त्रास होई ||49||
जर नाही आले | झणी मी परत | उपरोक्त पापे | माझ्या माथी ||50||
ऐकोनी शपथ | द्रावले हृदय | व्याध सोडी तीस | पतीकडे ||51||
त्याच क्षणी त्यास | सुंदर हरीण | पुनःश्च दिसले | तळ्याकाठी ||52||
सावरे धनुष्य | पाहुनी ते मृग | करी विनवणी | निषादास ||53||
भक्तीपराङ्ग्मुख | द्रव्य जो चोरतो | उपवास विना | नरकात ||54||
मूर्तीभंजकही | गुरुद्रोही तथा | पालकांना त्रास | कष्ट देई ||55||
परस्त्रीची चेष्टा | आप्तेष्टांची हत्या | गो ब्राह्मण वध | पातक ते ||56||
शिवध्यान त्यागे | बधिर तो होई | प्रसाद वंचित | आखडे तो ||57||

अशी सर्व पापे | मम डोईवर | जर नाहीं आलो | परतून ||58||
मृगासही सोडी | फिरून तो व्याध | शिवपूजा चालू | अखंडीत ||59||
नकळतपणे | महाशिवरात्र | जागून काढली | व्याधाने त्या ||60||
चार वेळा पूजा | अनाहूतपणे | त्याची सर्व पापे | होती भस्म ||61||
फुटले तांबडे | पुन्हा एक मृग | व्याधास दिसले | काठावर ||62||
बोले तेंव्हा मृग | कोवळी पाडसे | भुकेली असती | माझ्या घरी ||63||
फिरून येईन | दूध हे पाजून | मग मम हत्या | करावी जी ||64||
गुरांचा जो चारा|जाळी उगा सारा| गाय ब्राह्मणाला| तिष्ठवी जो ||65||
कलह करे जो | साधूंचाही द्वेष | ग्रंथांची ही चोरी | बळे करी ||66||
अती जो कंजूष | भुजंग तो बने | दान जो न करी | दुय्यम तो ||67||
द्विजाची कुचेष्टा | करी तो अधम | भोळा सांब तेंव्हा | कोपतसे ||68||
अशी सर्व पापे | यावी मम माथी | फिरून जर मी | नाही आले ||69||
ऐकोनी शपथ | धाडी तीस व्याध | लेकरांकरिता | अरण्यात ||70||
स्वकार्ये करून | मृग कुटुंब ते | येतसे परत | व्याधाकडे ||71||
अहमहमिका| त्या सर्वांच्यामध्ये| कोणाचा तो जीव| आधी जावा ||72||
पाहुनी व्याधाचे | हृदय द्रावले | देतसे सर्वांना | जीवदान ||73||
अवतरे तेंव्हा | शिवाचे विमान | मृगांसह व्याध | उद्धरला ||74||
जे कोणी ऐकेल | व्याधाचे आख्यान | उत्तम ते फळ | मिळे त्यास ||75||
संपूर्ण जाहला| द्वितीय अध्याय| नमन करूया | त्रिनेत्रास ||76 ए 109||

श्री

## अध्याय तिसरा

### गोकर्ण क्षेत्र महात्म्य (मित्रसह आख्यान)

साष्टांग नमन | करोनी शिवास | सूत सांगे आज | एक कथा ||1||
इक्ष्वाकू कुळीचा | मित्रसह राजा | सम्राट तो आला | शिकारीस ||2||
प्राणीपक्षांसवे | मारला राक्षस | बंधू त्याचा पाही | दुष्कृत्य ते ||3||
सूडबुद्धीने तो | आचारी बनून | राजाकडे येई | महालात ||4||
नेमणूक त्याची | राजप्रासादात | आचारी म्हणून | तेंव्हा झाली ||5||
वशिष्ठ मुनींना | नरमांस वाढी | मित्रसह मात्र | शापग्रस्त ||6||
उलट तो शाप | देण्या ना धजला | स्वतः मात्र झाला | कल्मषपाद ||7||
सत्य ते जाणता | मुनींचा उःशाप | बारा साल तुला | त्रास आहे ||8||
राक्षस तो झाला |त्याने केली हत्या |कोवळया द्विजाची | पत्नी पुढे ||9||
पतिव्रता पत्नी  | बोले त्यास तेंव्हा | रतीसुखा तू बा | मुकशील ||10||

होऊन तो कष्टी | एके दिनी आला | गौतममुनींच्या | आश्रमात ||11||
मुनीराज  तेंव्हा | वर्णन सांगती | गोकर्णक्षेत्राचे | भूपाळाला ||12||
!कार रूपाने | शिवपार्वतीचा | मंगल तो वास | गोकर्ण क्षेत्री ||13||
गौतम सांगती | मित्रसह नृपा | तीर्थ निर्मितीचे | कथानक ||14||
मातेस तोषण्या | केले दशानने | शिवासाठी तप | अती उग्र ||15||
प्रसन्न तो झाला | सांब सदाशिव | म्हणे दशानना | वर माग ||16||
शिवास तो मागी | आत्मलिंग त्याचे | सुंदर स्त्रीची तो | धरे हाव ||17||
आत्मलिंगासंगे | पार्वतीही दिली | निघाला जाण्यास | लंकेमाजी ||18||
कुटुंब शिवाचे | शोकसागरात | भवानी आठवे | श्रीविष्णूस ||19||
ब्राह्मण रूपात | विष्णू रावणास | म्हणे ही म्हातारी | कुठे नेतो ||20||
खाली ठेवोनिया | त्या भद्रकालीस | रावण कैलासी | परतला ||21||
मंदोदरी रूपे | मिळेल भार्या ही | जेंव्हा ती येईल | योग्य वेळ ||22||
देवूनी वचन | त्यास त्रिनयन | धाडी तो सत्वर | लंकेमार्गी ||23||
आत्मलिङ्गासवे | करी दशानन | लंकेच्या दिशेने | मार्गक्रमण ||24||
सर्व देव तेंव्हा | करिती ते ध्यान | आठविती मनी | गजानन ||25||
घेवोनी सत्वर | गुराख्याचा वेष | रावणापुढती | गणपती ||26||
गेला तो रावण | लघुशंकेसाठी | आत्मलिंग हाती | गणेशाच्या ||27||
भरल्या जेंव्हा त्या | तीनही घटका | खाली ठेवी पिंडी | गौरीपुत्र ||28||
शंकराची ऐशी| अगाध ही लीला| स्थायी शिवलिंग| त्याच जागी ||29||
श्रीक्षेत्र गोकर्ण | महाबळेश्वर | पुण्यप्रद तीर्थ | भूलोकात ||30||
ऋषी ते सांगती | आणि एक कथा | उद्धारली कशी | चांडाळीण ||31||
कैकयद्विजाची | होती ती सुकन्या | सुमित्रा नामक | रूपवान ||32||
अत्यंत गर्विष्ठ | कुलास कलंक | गोहत्या घडली | तिच्यायोगे ||33||
शिव शिव बोले | भानावर येता | एवढेच पुण्य | गाठी तिच्या ||34||
जन्माने आंधळी | महाशिवरात्री | अन्न मागत ती | फिरतसे ||35||
हाती येता एक | बिल्वदल तिच्या | टाकून ती देई | झडकरी ||36||
बेलाचे ते पान | महाबळेश्वरी | शिवपिंडीवरी | पडले बा ||37||
लोकांचे ऐकून | मनी शिवध्यान | करू लागे तेंव्हा | चांडाळीण ||38||
अप्रत्यक्षपणे | शिवपूजनाने | अंती गाठले ते | शिवपद ||39||
मित्रसह राजा | श्रीक्षेत्र गोकर्णी | लिंगाचे पूजन | कर्ता झाला ||40||
उद्धार तयाचा | शंकराने केला | मुक्त तोचि झाला | दिव्यदेही ||41||
संपूर्ण जाहला| तृतीय अध्याय | नमन करावे | महेशाला ||42 ए 151||

श्री

## अध्याय चवथा

### गोपकुमार चरित्र वर्णन (विमर्शन-चंद्रसेन आख्यान)

शिव भोळासांब | भक्तांचा भुकेला | भक्तांसाठी झणी | प्रकटतो ||1||
किरात देशीचा | विमर्शन राजा | पातकी तरीही | शिवभक्त ||2||
कुमुद्वती राणी | विचारे तयास | कशासाठी करी | धर्मभेद ||3||
विमर्शन तेंव्हा | सांगे स्वभार्येस | स्वतःचाच जन्म | श्वानाचा तो ||4||
अप्रत्यक्षपणे | झाल्या प्रदक्षिणा | त्याच्यामुळे पुण्य | गाठी आले ||5||
मागील जन्मात | राणी कबूतर | ससाण्या पुढती | पळतसे ||6||
अनाहूतपणे | तीन प्रदक्षिणा | शिवास घातल्या | पुण्यप्रद ||7||
अशा पुण्यामुळे | दोघांस मिळाला | पवित्र असा तो | मनुष्यजन्म ||8||
पुढील जन्मात | कसे प्रकटणे | सांगतसे राजा | कुमुद्वतीस ||9||
सिंधू सौराष्ट्रात | होईन मी राजा | गांधार नरेश | त्या पश्चात ||10||
अवंतीचा राजा | अनार्त नरेश | पांड्यराज होईन | त्यानंतर ||11||
जया व कलिंग | राज्यांची तू कन्या | अनुक्रमे होशी | माझी पत्नी ||12||
दाशार्ही सुपुत्री | मग ती ययाती | त्यानंतर होशी | वसुमती ||13||
सातव्या जन्मात| घेऊनी हि दिक्षा | अंती जाऊ दोघे | शिवाप्रती ||14||
शिव-भजनाचा | महिमा तो मोठा | शिवनाम एक | पुण्यप्रद ||15||
उज्जैन नरेश | चंद्रसेन राजा | महांकाळ भक्त | तो निस्सीम ||16||
मणिभद्र त्याचा | जिवलग मित्र | दिव्य मणी त्यास | देता झाला ||17||
मणी बहुगुणी | सत्यास तारक | कशाची ददात | नाही राज्ञा ||18||
करोनी मत्सर | शत्रू एक झाले | चालोनिया आले | उज्जैनीवर ||19||
चंद्रसेनाकडे | मागितला मणी | सर्व नृपाळांनी | आडमुठ्या ||20||
युद्धाची सूचना | सैन्यास देवोन | राजा मात्र करी | शिवध्यान ||21||
गोपिका कुमार | चंद्रसेनाकडे | एकटकपणे | बघतसे ||22||
स्थापन करोनी | तिथून जवळ | दगडाचे एक | शिवलिंग ||23||
पूजामांडली बा | छोट्या बालकाने | मातेने तयाच्या | उधळली ||24||
मनातून दुःखी | कुमार तो झाला | प्रसन्न भक्तीने | सदाशिव ||25||
साक्षात शंकर | अवतरे तेंव्हा | घराचेही रूप | पालटले ||26||
रत्ने आणि सोने | दिव्य अलंकार | गोपिकेवरती | झळकती ||27||
घेवोनी शिवाचे | पवित्र दर्शन | राजास सांगण्या | आतुरली ||28||
प्रकटला शिव | ऐकोनिया वृत्त | चंद्रसेनाप्रति | शत्रू नत ||29||

हनुमान तेंव्हा | तिथे प्रकटला | बालका दिधला | आशिर्वाद ||30||
तयाने ठेवले | श्रीकर हे नाम | भाग्यवंत अश्या | कुमाराचे ||31||
श्रीकर वंशात | नंद घेईल जन्म | कृष्ण रूपे विष्णू | अवतरेल ||32||
ऐकून हे बोल | हनुमंताचे त्या | धन्य जाहला तो | श्रीकरही ||33||
विमर्शन आणि | चंद्रसेनाचे या | जो कोणी ऐकेल | हे आख्यान ||34||
इच्छित संतती | अमाप संपत्ती | आयुष्य आरोग्य | मिळे तया ||35||
संपूर्ण जाहला| चतुर्थ अध्याय| नमन करू या | विश्वम्भरा ||36 ए 187||

श्री

## अध्याय पाचवा

### प्रदोषव्रत महात्म्य (धर्मगुप्त आख्यान)

सदाशिव नाम| मुखी ज्याचे सदा | आयुष्यात त्याच्या | कमी नाही ||1||
जो कोणी करेल | प्रदोषाचे व्रत | वर्षी होय ज्ञानी | आपोआप ||2||
एका तपामध्ये | धनवान होई | कथिती महिमा | व्यासऋषी ||3||
विदर्भ देशीचा | सत्यरथ राजा | शिवपूजेप्रति | पराङ्ग्मुख ||4||
शाल्वनृप जेंव्हा | चालुनिया आला | राजा सत्यरथ | कामी आला ||5||
सुंदर तयाची | गरोदर भार्या | वणवण फिरे | रानी वनी ||6||
एका वृक्षाखाली | जन्म दिला तिने | गोजिऱ्या बाळास | सुकुमार ||7||
उमा नामे नारी | घेवोनिया जाई | यतीच्या आज्ञेने | त्या बाळास ||8||
स्वयं पुत्र त्याचे | शुचिव्रत नाम | धर्मगुप्त म्हणे | राजपुत्रा ||9||
एकचक्र ग्रामी | शांडिल्य ऋषींच्या | यज्ञासाठी गेली | पुत्रांसह ||10||
ऋषिवर तिला | करिती कथन | कशामुळे आले | दुःखभोग ||11||
सत्यरथ राजा | कोणे एके काळी | शिवपूजेतून | उठलासे ||12||
म्हणून तयास | दुःख हे लाभले | धर्मगुप्तासही | लागे पाप ||13||
प्रदोषाचे वेळी | पार्वतीसमोर | शिवशंभू स्वतः | नाचतसे ||14||
सरस्वती वीणा | पुरुहूत पावा | लक्ष्मीही छानसा | ताल धरी ||15||
यक्षपती आणि | देवी भार्गवीही | सर्वांसमवेत | पाही नृत्य ||16||
असा भाग्यप्रद | प्रदोषाचा काळ | शिवनामी तेंव्हा | व्हावे रत ||17||
शुचिव्रतानेही | जन्मात मागच्या | केल्यामुळे पापे | आता कष्टी ||18||
नंतर ते दोघे | उमेचे कुमार | शाण्डील्यांची दीक्षा | घेते झाले ||19||
पंचाक्षर मंत्र | घेती गुरुमुखे | प्रदोषाचे व्रत | ऐकोनिया ||20||
पक्षप्रदोष व | शनिप्रदोष ही | विशेष जाणावे | मुनी म्हणे ||21||
राहोनिया पूर्ण | दिन निराहार | संध्याकाळी मात्र | शिव वंदा ||22||

गोधूम लिंपित | शुद्ध भूमीवर | केळी कर्दळीच्या | मांडवात ||23||
करावे पूजन | स्थापोनिया लिंग | शुभ्र वस्त्रामाजी | शुद्धचित्ते ||24||
मुरांतक अग्नि | गणेश व सिध्दी | भैरव दिक्पाल | पूजावे जी ||25||
नंतर एकदा | धनयुक्त हंडा | शुचिव्रते बांधवा | देऊ केला ||26||
नाकारी तेधवा | धर्मगुप्त त्यासी | म्हणे शिवपूजा | शिरोधार्य ||27||
दोघेही कुमार | वनात फिरता | दिसल्या तयांना | गंधर्वकन्या ||28||
अंशुमती नामे | गंधर्वाची कन्या | म्हणे धर्मगुप्ता | स्वीकारा मज ||29||
तात संमतीने | विवाह करून | चालू लागली ती | विदर्भाकडे ||30||
दुर्मर्षणाचाही | करून पाडाव | धर्मगुप्त मग | राजा झाला ||31||
शिवभक्ती योगे | सुख भोगुनिया | प्राप्त त्यास झाला | एक पुत्र ||32||
सूरजास सर्व | राज्य देवोनिया | अंती तोही गेला | शिवपदी ||33||
धर्मगुप्ताचे हे | पवित्र अख्यान | जो कोणी करेल | श्रवण भावे ||34||
पातकांचा नाश | तयाच्या होतसे | प्रदोष व्रताने | शुध्दी होय ||35||
शिवलीलामृत| ग्रंथ घरी ज्याच्या| तयाच्या पाठीशी | शिव उभा ||36||
ग्रंथाच्या रूपाने | आम्रवृक्ष घरी | फळांचा आस्वाद | घ्यावा वेगी ||37||
संपूर्ण जाहला | पंचम अध्याय | नमन करावे | भालचंद्रा ||38 ए 225||

श्री

## अध्याय सहावा

### सोमवारव्रत महात्म्य (सीमंतिनी आख्यान)

मदनांतक तू | हिमाद्री जामात | गंगाधर शिव | कर्पूरगौर ||1||
नीलकंठ आणि | असुरछेदक | त्रितापहारक| भक्तसखा ||2||
इच्छित ते देशी | ध्यास तुझा घेता | तव वर्णन हे | अवघड ||3||
आर्यावर्तामध्ये | चित्रवर्मा नृप | होता तोही खूप | पुण्यवान ||4||
कन्येच्या कारणे | केल्याने नवस | प्राप्त त्यास झाली | एक कन्या ||5||
सीमंतिनी नामे | झाली ती प्रख्यात | भविष्यात होते | वैधव्य ही ||6||
शंकर कृपेने | जाई गंडांतर | पंडित बोलला | नृपाळास ||7||
अतीव सुंदर | असली तरीही | वैधव्याची चिंता | सदा मनी ||8||
याज्ञवल्क्यपत्नी | मैत्रेयी तियेस | सांगती जाहली | व्रत एक ||9||
सोमवारव्रत | पंचाक्षरमंत्र | षोडशोपचारे | शिवपूजा ||10||
ब्राह्मण सवाष्ण | पूजा मनोभावे | व्रतापासुनी या | ढळणे नाही ||11||
शिवअभिषेक | पापांचा नाशक | मंत्राक्षद पुष्प | भाग्यदायी ||12||
धूप दीप तथा | नैवेद्य तांबूल | नमन करोनी | प्रदक्षिणा ||13||

शिवनाम जप | होम व हवन | कीर्तन आणखी | शिवध्यान ||14||
नृत्य करोनिया | अलंकार द्यावे | ब्राह्मण भोजन | पापहारी ||15||
सीमंतिनी ऐसे | सोमवारव्रत | करितसे नित्य | मनोभावे ||16||
नलाचा तो पौत्र | इंद्रसेनपुत्र | चित्रांगद झाला | प्राणसखा ||17||
नेत्रदीपक तो | विवाह सोहोळा | आप्तेष्ट जाहले | अती तृप्त ||18||
आनंदे नांदती | सीमंतिनी आणि | चित्रांगद राजा | सासुरवाडी ||19||
कोण्या एका दिनी | शिकारीनंतर | नौकानयनास | नृप गेला ||20||
यमुनापात्रात | मोठ्या वादळात | अडकली नौका | उलटली ||21||
जमले किनारी | चित्रवर्मा आणि | सीमंतिनीसवे | इंद्रसेन ||22||
चित्रांगदमाता | शोकात बुडाली | न कळे कशाने | असे झाले ||23||
महाशिवरात्री | जेवण केले का | मोडले व्रत का | सोमवारचे ||24||
केला मी कधी का | विष्णू शिव भेद | धनलालसा वा | पंक्ती भेद ||25||
भुकेल्याचा घास| काढला कधी वा | सद्‌गुरूचा द्रोह | कधी केला ||26||
जाता मायदेशी | समजले त्यांस | शत्रूने स्व राज्य | बळकावले ||27||
अश्या दुःखातही | सीमंतिनीने त्या | नाही ते सोडले | कधी व्रत ||28||
चित्रांगद मात्र | पडोनी पाण्यात | नागलोकी गेला | सुखरूप ||29||
तक्षक राजास | सांगे तेंव्हा नृप | शंकरचि माझा | इष्टदेव ||30||
प्रकृती पुरुष | शिवाचा पसारा | तोचि असे खरा | मूळ गाभा ||31||
सूर्य ज्याचे नेत्र | चंद्र ज्याचे मन | विराट तो देव | शिव जाणा ||32||
तक्षके करिता | राहण्याची विनंती | चित्रांगद त्यास | विनवी तो ||33||
कृपा करूनी | तू सोड मज राजा | कुटुंबापासून | वंचित मी ||34||
ऐकुनी विनंती | सोडले तयास | यमुनेच्या तीरी | अलगद ||35||
चिंतामणीसवे | अनेक रत्नेही | नागराजे दिली | चित्रांगदास ||36||
यमुना समीप | सख्यांसमवेत | सीमंतिनी आली | स्नानासाठी ||37||
चित्रांगद  तेंव्हा | ओळख ना देई | हात धरी हाती | प्रेमापोटी ||38||
सांगे तेंव्हा राजा | सीमंतिनी कानी | नाही निवर्तला | तव पती ||39||
झणी ओळखला | स्वतःचा भ्रतार | मनात आनंदी | जाहली ती ||40||
दूत गेला वेगे | निषाध पुरास | उलथवी राज्य | शत्रूचे त्या ||41||
इंद्रसेन राजा | फिरूनिया येई | पुत्रदर्शनास | वायू वेगे ||42||
चित्रवर्मा नृप | गेला हरखून | उघडी भांडार | प्रजेसाठी ||43||
दोनही देशींच्या | राज घराण्यात | झाला खरोखर | अत्यानंद ||44||
सोमवारव्रत | महापुण्यदायी | शंकराचे पदी | मिळे स्थान ||45||

अष्टपुत्रा झाली| राणी सीमंतिनी| चंद्रसेन झाला| तोही राजा ||46||
सम्राट म्हणोनी| मिळाली मान्यता| अनेक वर्षे तो| सिंहासनी ||47||
सीमंतिनीचे हे| सुंदर अख्यान| श्रवण जो करी| हर्षभरे ||48||
परतोनि येई| पती झडकरी| हरविता पुत्र| येई मागे ||49||
आयुरारोग्य व | ऐश्वर्य मिळेल| विद्या प्राप्त होय| आपसूख ||50||
संपूर्ण जाहला| सहावा अध्याय| वंदन स्वीकारा| नीलकंठा||51 ए 276||

श्री

## अध्याय सातवा

### जीवनोपदेश वर्णन (भद्रायू जीवदान आख्यान)

वेदमित्र द्विज | सारस्वत सखा | कुमार तयांचे | सख्खे मित्र ||1||
सुमेधा आणखी| सोमवंत नामे| असती दोघेही| विद्यावान ||2||
जाऊन भेटती| राजास ते दोघे| विद्वत्ता दाविती| असामान्य ||3||
करी आज्ञा राजा| दोहो ब्राह्मणास| एक काम खास| करण्याची ||4||
निषाद नरेश| चित्रांगद थोर| सीमंतिनी राणी| पतिव्रता ||5||
एकाने घालून| स्त्री वेष सुंदर| निषादास जाणे| दाम्पत्यरूपे ||6||
असल्याने राणी| शिवभक्त थोर| पूजन करोनी| देईल द्रव्य ||7||
त्यातील पुष्कळ| धनाची लालूच| राजा दावी दोघां| एकाएकी ||8||
जरी दोघेजण| सांगती राजास| काम करण्यास| असमर्थ ||9||
राजहट्टापाई| मानली विनंती| पोहोचले दोघे| निषाद देशी ||10||
अंतर्ज्ञानापाई| सीमंतिनीने ही| सत्य परिस्थिती| ओळखली ||11||
तरीही दोहोंस| शिव उमा रूपे| पूजिले बहुत| मनोभावे ||12||
असत्य वागोन| सोमवंताने त्या| खराच स्त्री देह| प्राप्त केला ||13||
प्रणय कामना| करू लागे नारी| सुमेधा समीप| जाऊ पाहे ||14||
झिडकारूनीया| तयाची ती इच्छा| सुमेधा राहिला| स्थिर बहू ||15||
स्थिर मनोवृत्ती| विद्वत्ता विरक्ती| निगर्वी वर्तन| शिव रूप ||16||
प्रसिद्धी पासून| पराङ्ग्मुख नर| शिव तो सत्वर| जाणावा जी ||17||
सारस्वत झाला| व्याकूळ दुःखाने| एकुलता पुत्र| स्त्री देहात ||18||
राजाला तो आता| लागे दोष देऊ| वर्तनाने त्याच्या| नृप खिन्न ||19||
केल्यावरी तप| प्रकटे पार्वती| म्हणे सीमंतिनी| भक्त थोर ||20||
काहीही बदल| नाही मज शक्य| करावा विवाह| दोघांचाही ||21||
पुत्र या दोघांचा| असेल सुंदर| एवढे वचन| मी देईन ||22||
कथा ती दुसरी| व्यास ते सांगती| अवंती पुरीच्या| मदनाची ||23||

कामातुर द्विज | पिंगला वेश्येच्या | आहारी जावोनी | करी पापे ||24||
ऋषभ नामक | शिवभक्त थोर | घरात पातले | पिंगलेच्या ||25||
करोनि पूजन | दोघांनी तयाची | मनोभावे खूप | केली सेवा ||26||
जरी या जन्मात | घडली पातके | शिवसेवेचे ते | पुण्य गाठी ||27||
दाशार्ह नरेश | वज्रबाहू पोटी | मदन जन्मला | सुमती पुत्र ||28||
सीमंतिनीकन्या | रूपात जन्मली | पिंगला फिरून | नर देही ||29||
सावत्र मातांच्या | द्वेषाने पोळला | मदन असता | गर्भ रूपी ||30||
फोडयुक्त त्वचा | घेउन जन्मला | वेदनेने सदा | तळमळे ||31||
राजाने सोडले | माय लेकरांस | निर्दयीपणाने | अरण्यात ||32||
शिव आराधना | सुमतीने केली | भेटला तियेला | वैश्य पुत्र ||33||
समवेत त्याच्या | आली वैश्यपुरा | राजाने ऐकली | हकीकत ||34||
राजा पद्माकर | सुमतीस मानी | स्वयं धर्मकन्या | देई आश्रय ||35||
सामोरी गेली ती | पुत्र वियोगाला | अती शोक करी | रडे वेगे ||36||
त्याच वेळी एक | शिवयोगी आला | सांत्वन तयाने | तिचे केले ||37||
न कळे  कोणास  | जन्म मृत्यू चक्र | कशापाई शोक | करिसी तू ||38||
मनुष्यजीवन | एक मृगजळ | सारे आहे खोटे | तूची जाण ||39||
वाऱ्याचा मंडप | कासवाचे दूध | मृगजळी मत्स्य | नाही शक्य ||40||
चित्रातला चोर | चोरी करी काय | तसेच आयुष्य | भासमान ||41||
मानवी शरीर | रोगांचे भांडार | अस्थी मांस यांची | एक मोट ||42||
असा अपवित्र | देह त्याची होय | गोमुत्राने शुद्धी | हेची गूढ ||43||
नदीमध्ये देख | दोन लाकडांची | थोड्या वेळासाठी | जवळीक ||44||
वृक्षावर मोठ्या | दोन पक्षी येती | काही काळासाठी | भेट घेण्या ||45||
प्रपंचरूपी या | एका वृक्षावर | जीव शिव दोन | पक्षी जाण ||46||
जीव सदा पाही | विषयात सूख | शिव तो शरण | सद्गुरूस ||47||
शिवरूप एक | असे चिरस्थायी | नरदेह आहे | अशाश्वत ||48||
ऐकून तयाचे | सदर वचन | म्हणे योग्यास ती | तूची शिव ||49||
भक्तांचा तारक | ब्रह्मांड नायक | त्रिताप हारक | असशी तू ||50||
यती सांगे तिला | मृत्युंजय मंत्र | मृत तिचा बाळ | केला जिवंत ||51||
नियमितपणे | मृत्युंजय ध्यान | करण्या सांगोन | यती गेला ||52||
होता भद्रायूचे | बारा वर्षे वय | फिरून तो आला | शिवयोगी ||53||
शिकवले त्याने | नीतीशास्त्र त्यास | केला उपदेश | आनंदाने ||54||
संपूर्ण सृष्टी ही | शिवाचेच रूप | ठेव सदा जाण | मनोमन ||55||

गो ब्राह्मण प्रजा| सर्वांचे पालन| कर्तव्य हे तुझे| सर्वप्रथम ||56||
शब्दांचा वापर| जपून करणे| सेवकांवरती| लक्ष ठेव ||57||
अतिथी व मित्र| पशू धन शेती| सर्वांचा सांभाळ| नित्य कर ||58||
गुरू व पालक| योगी ज्ञानी यांची| चुकूनही कधी| निंदा नको ||59||
षड्रिपूंचा त्याग| त्वरित करोन| शिवनामी तव| लागो ध्यान ||60||
दुर्जन खंडन| सज्जनांशी मैत्री| नीतीचे पालन| सदा घडो ||61||
योग्य तो आहार| नित्य व्यवहार| निद्रा घ्यावी रोज| नियमीत ||62||
दिलेले ते दान| केलेली सत्कर्मे| मान वा अवमान| चर्चू नये ||63||
नास्तिक व धूर्त| कपटी वा चंचल| यांची रे संगत| असू नये ||64||
संसार करोनी| रहावे अलिप्त| जसे तळ्यातले| कमलदल ||65||
प्रेमळ वर्तन| सुशांत हे मन| अंगी सदाचार| बाणवावा ||66||
विद्येसाठी दान| आपत्तीत धैर्य| रणी पराक्रम| सुलक्षण ||67||
रुद्राक्ष धारण| शिवाचे पूजन| जाण हेची तव| शिवकवच ||68||
सोमवार व्रत| शिवरात्र व्रत| प्रदोषाचे व्रत| पुण्यदायी ||69||
आप्तांसमवेत| भोजन आस्वाद| उत्तम जेवण| तेचि जाण ||70||
कुयोगात सुख| अपात्री ते दान| दुष्टाची बा पूजा| कधी नको ||71||
आनंदी जीवन| संत समागम| नेई तुज नित्य| शिवाप्रती ||72||
खातो तेचि अन्न| पितो ते जीवन| संवाद औदार्य| रत्ने जाण ||73||
करी जो वर्तन| वरील प्रमाणे| पावे तोची सूख| विनासायास ||74||
सदर अध्याय| प्रदक्षिणा जाण| कैलासात स्थित| शंकराला ||75||
संपूर्ण जाहला| सातवा अध्याय| त्रिवार वंदन| महादेवा ||76 ए 352||

श्री

## अध्याय आठवा

### शिवप्रसाद कथन (भद्रायू विवाह आख्यान)

गुरूच्या आज्ञेचे| सदैव पालन| भद्रायू करोन| सुखी झाला ||1||
मृत्युंजय जप| रुद्राक्ष धारण| भस्माचे लेपन| करी सदा ||2||
योगी देता झाला| तलवार शंख| शत्रू निर्दालन| करण्यास ||3||
देवोनी आशिष| कल्याणकारक| योगी तो पावला| अंतर्धान ||4||
भद्रायूचा तात| दाशार्ह नृपती| वज्रबाहू करी| प्रजापालन ||5||
चालून तो आला| मगध नरेश| हेमरथ असा| एकाएकी ||6||
वज्रबाहू झाला| पूर्ण पराभूत| आणि मनी झाला| खिन्न अती ||7||
समजता वार्ता| सुनया सहित| भद्रायू निघाला| मदतीस ||8||

योग्यास स्मरून| देती ते आव्हान| पाहून तो शत्रू| भयभीत ||9||
दैवी खड्गा योगे| संपूर्ण पाडाव| हेमरथ राजा| बंदिवान ||10||
वज्रबाहू झाला| तेंव्हा बंधमुक्त| सिंहासनी पुन्हा| बसविला ||11||
शिवयोगी सांगे| सदर ही कथा| चित्रांगद आणि| सीमंतिनीस ||12||
पद्माकर आणि| सुमती राज्ञीस| हीच गोष्ट त्याने| ऐकविली ||13||
झाले दोघेजण| कृतकृत्य अती| पुत्रांचा देखोन| पराक्रम ||14||
आज्ञा करी योगी| चित्रांगदासही| द्यावी तव कन्या| भद्रायूस ||15||
देऊन संमती| राजा आणि राणी| गुरु आज्ञा मानी| शिरोधार्य ||16||
चित्रांगद सांगे| पूर्ण कथानक| ऐकोनिया थक्क| वज्रबाहू ||17||
म्हणे चित्रांगद| भद्रायू हा तव| पुत्र असे थोर| पुण्यवान ||18||
राजा वज्रबाहू| पश्चात्ताप दग्ध| उगा दिले दुःख| पुत्रा भार्ये ||19||
संपन्न जाहला| विवाहसोहोळा| कीर्तीमालिनी अन| भद्रायू चा ||20||
सुमती जाहली| पट्टराणी पुन्हा| धन्य तो जाहला| वज्रबाहू ||21||
शिवनामी रत| भद्रायूने मग| राज्य केले पुढे| आनंदाने ||22||
करित असता| वनात विहार| राणी बरोबर| एके दिनी ||23||
आक्रोश ऐकला| एका दम्पतीचा| पती करे त्याची| विनवणी ||24||
मागे आहे पत्नी| तिच्या मागे वाघ| वाचवा तुम्ही हो| महाराज ||25||
काळ रूपी वाघ| घालोनी झडप| पत्नीस मारून| चालू लागे ||26||
द्विज लागे रडू| पत्नीशोकापाई| करी निर्भत्सना| भद्रायूची ||27||
म्हणे फुका गेली| तुझी सर्व शस्त्रे| बळ जे मिळाले| नागलोकी ||28||
कलंकिणी नारी| छळणारा पुत्र| निष्काम तो राजा| व्यर्थ आहे ||29||
शिवावीण अन्य| काही नाही सत्य| अरे तूही हेच| जाणतोस ||30||
नाही वाचवले| माझ्या पत्नीस तू| काय उपयोग| राजा तुझा ||31||
भद्रायू तो म्हणे| पुनश्च विवाह| करोनी हे विप्रा| सुखी हो तू ||32||
ब्राह्मण तो म्हणे| माझीच दे पत्नी| भद्रायू म्हणे हे| अशक्यचि ||33||
मागे विप्र त्याची| रूपवान भार्या| परीक्षाच पाही| भद्रायूची ||34||
दान देऊनिया| कीर्तीमालिनीचे| अग्नीत भद्रायू| उडी घेई ||35||
प्रकट जाहले| शिव व पार्वती| भद्रायूस म्हणे| वर माग ||36||
म्हटला भद्रायू| करावी जिवंत| कुलीन ती भार्या| ब्राह्मणाची ||37||
म्हणे सदाशिव| मीच तो ब्राह्मण| आणि मीच होतो| वाघ तोही ||38||
परतून देई| कीर्तीमालिनीस| म्हणे आता तूच| वर माग ||39||
भद्रायू तो बोले| माता तात आप्त| सर्वां देई थारा| चरणी तुझ्या||40||

